सन २००४-२००५ व २००५-२००६ या दोन वर्षासाठी खाजगी अनुबोधपट निर्मात्यांच्या यादीस (पॅनल) शासन मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.माजम-२००४/६१५/प्र.क्र.८६/०४/३४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- २९ जानेवारी, २००५.**

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.चित्रपट-१०८८/५३७६/७१०/८८/३४, दिनांक २०.७.१९९८९

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.माजम-१०००/२९६८/प्र.क्र.२९९/२०००/३४, दिनांक २९.९.२०००

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.माजम-२००२/७४४/प्र.क्र.६०/३४, दिनांक १४.८.२००२

४) शासन निर्णय क्र.माजम-२००४/२९६/प्र.क्र.४२/३४ दिनांक २ जुलै, २००४

५) सचांलक (माहिती ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांचे क्र.वृत्तचित्र-२००४/निर्माता शा.मा.यादी / का-७/३५२, दि. १६.१०.२००४

**शासन निर्णय:-**

खाजगी अनुबोधपट निर्मात्यांच्या सन २००२-२००३ व २००३-२००४ च्या शासनमान्य यादीस अनुक्रमांक ४ वरील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. ही मुदत दिनांक ३० सप्टेंबर, २००४ रोजी संपली आहे. पुढील दोन वर्षाकरिता म्हणजे सन २००४-२००५ व २००५-२००६ करिता नवीन यादी तयार करुन त्या यादीस शासन मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून या कामाकरिता एक समिती नियुक्त करण्यात आली होती. तसेच निकष ठरविण्यात आले होते. त्यानुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून प्राप्त झालेल्या अर्जातून अनुभव, गुणवत्ता व पुरस्कार मिळालेल्या व निकष पूर्ण करणा-या २८ निर्मात्यांची समितीने निवड केली.

असून यादी शासन मान्यतेकरिता शासनाकडे पाठविली आहे. त्या निर्मात्यांची नांवे पत्रासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविण्यात आली आहेत.

सन २००४-२००५ व २००५-२००६ या दोन वर्षासाठी ठरवून दिलेले निकष पूर्ण करणा-या व समितीने शिफारस केलेल्या २८ खाजगी अनुबोधपट निर्मात्यांच्या यादीस शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत यादी दिनांक ३१ डिसेंबर, २००६ पर्यंत अस्तित्त्वात राहील.

हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.चित्रपट-१०८८/५३७६/७४०/८८/३४, दिनांक २० जुलै, १९८९ मधील निर्धारित अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र. पां. मंत्री)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (२ प्रती),
उपसंचालक (चित्रपट), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (२ प्रती),
सर्व मंत्रालयीन विभाग,
यादीतील सर्व संबंधित अनुबोधपटनिर्माते,
निवडनस्ती.